स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेची सन २०२३-२०२४ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. फुंफला-२०२३/प्र.क्र.१४३/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १४ जून, २०२३

**संदर्भ:-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. राफयो-२०१८/प्र.क्र. ४७/९-अे, दि. ६.७.२०१८
२) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले जा.क्र. कृआ/फलो-२/भा.फुं.फ.योजना/२०२३-२४/१३९२६/२३, दिनांक २१ एप्रिल, २०२३ चे पत्र
३) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले जा.क्र. कृआ/फलो-२/भा.फुं.फ.योजना/२०२३-२४/१८९३३/२३, दिनांक ६ जून, २०२३ चे पत्र

**प्रस्तावना :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जे शेतकरी फळबाग लागवडीकरिता पात्र ठरु शकत नाहीत अशा शेतकऱ्यांसाठी राज्य शासनाने उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सुरु केली आहे. संदर्भ क्रमांक २ व ३ येथील पत्रांन्वये संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेची सन २०२३-२०२४ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत विनंती केली आहे. या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) राज्यात स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना या योनजेची सन २०२३-२०२४ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेल्या एकूण रु. १०२५०.०० लाख (रुपये एकशे दोन कोटी पन्नास लाख फक्त) इतक्या निधीच्या कार्यक्रमास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| प्रवर्ग | अर्थसंकल्पिय तरतूद (रु. लाखात) | या आदेशान्वये देण्यात येणारी प्रशासकीय मान्यता (रु. लाखात) |
|---|---|---|
| सर्वसाधारण | १००००.०० | १००००.०० |
| अनुसूचित जाती | २००.०० | २००.०० |
| अनुसूचित जमाती | ५०.०० | ५०.०० |
| **एकूण रु.** | **१०२५०.००** | **१०२५०.००** |

२) या योजनेसाठी उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी त्या-त्या प्रवर्गाकरिता विहित केलेल्या लेखाशीर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.
३) सदर योजनेची संदर्भ क्रमांक १ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदी तसेच वेळोवेळी केलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने अंमलबजावणी करावी.
४) सदर योजनेंतर्गत विहित केलेल्या कार्यपद्धतीस अनुसरून आयुक्त (कृषि) यांनी क्षेत्रीय यंत्रणेस योजनेच्या अंमलबजावणीकरिता सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

५) संचालक (फलोत्पादन) यांनी सदर योजनेच्या अंमलबजावणीबाबतचा आढावा वेळोवेळी घ्यावा व त्याबाबतचा अहवाल वेळोवेळी आयुक्त (कृषी) यांचेमार्फत शासनास सादर करावा.

६) सदर योजनेंतर्गत निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन विभाग व वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०६१४१३१६५६१७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.06.14 13:18:11 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई-४०० ०३२.
६) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) अपर मुख्य सचिव (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१२) सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विषेश सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१३) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
१४) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१६) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१७) सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२१) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२२) सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -४०० ०३२.
२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२४) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२५) निवड नस्ती/९-अे.